**अंध,अस्थीव्यंगाने अधू आणि कण्याच्या विकाराने पीडित असणा-या कर्मचा-यांना वाहतूक भत्ता मंजूर करण्याबाबतच्या तरतुदी....**

अद्ययावत आदेश

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन परिपत्रक, क्रमांक : वाहभ-१३००/प्र.क्र.५७/सेवा-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ४ जून २००१.

**पहा :** (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :टीआरए-१३७९/सीआर-१७३७/एसईआर-५, दिनांक: २० फेब्रुवारी, १९८०.

(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : टीआरए-१३८१/सीआर-५४४/एसईआर-५, दिनांक: २९ जून, १९८१.

(३) शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांक : टीआरए-१३८२/सीआर-९८४/एसईआर-५, दिनांक: २० सप्टेंबर, १९८२.

(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : टीआरए-१०८३-सीआर-१३७५-एसईआर-५, दिनांक: ४ जानेवारी, १९८४.

(५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : टीआरए-१३८३-सीआर-१४५४/एसईआर-५, दिनांक: १० जानेवारी, १९८४.

(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विवाभ-१३८८/सीआर-६८०/सेवा-५, दिनांक: ८ मार्च, १९८९.

(७) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विवाभ-१३९०/प्र.क्र.३६१/सेवा-५, दिनांक: २० एप्रिल, १९९०.

(८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वाहभ-१०९८/प्र.क्र.८३/९८/सेवा-५, दिनांक: १४ डिसेंबर, १९९८.

(९) शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ -१०९८/प्र.क्र.८३/९८/सेवा-५, दिनांक: ६ जानेवारी, १९९९.

(१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:वाहभ- १०९९/प्र.क्र.८२/९९/सेवा-५, दिनांक: ७ सप्टेंबर, १९९९.

**शासन परिपत्रक**

ज्या अंध किंवा अस्थीव्यंगामुळे अधू किंवा कण्याच्या विकाराने पीडित असलेल्या (कार्यव्ययी कर्मचा-यांसह) नियमित आस्थापनांवरील शासकीय कर्मचा-यांना कामाच्या ठिकाणी जाण्यास अथवा तेथून परत येण्यास सर्वसाधारणपणे शारीरिक मदतीची आवश्यकता असते, त्यांना शासनाने विवक्षित अटींअधिन राहून **विशेष वाहनभत्ता** मंजूर केला होता. हया भत्त्याच्या दरात शासनाने वेळोवेळी सुधारणा केली होती. त्यानंतर शासनाने वरील (८) येथील आदेशान्वये सदर विशेष वाहनभत्ता बंद करुन त्या ऐवजी वर उल्लेखित अपंग कर्मचा-यांना दोन वेगवेगळया दराने **वाहतूकभत्ता** मंजूर करण्याबाबत आदेश निर्गमित केले आहेत. तसेच हे आदेश वरील (१०) येथील आदेशान्वये दि. १ ऑगस्ट, १९९७ पासून पुर्वलक्षी प्रभावाने लागू केले आहेत. अपंग कर्मचा-यांना वरील भत्ता मंजूर करण्याबाबतच्या आदेशातील सध्या अंमलात असलेल्या तरतूदी प्रशासकीय सोयीसाठी एकत्रितरित्या उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. **शासन आता या विषयीच्या**

**आदेशांतील अमलात असणा-या तरतूदी खालीलप्रमाणे एकत्रितरित्या उपलब्ध करून देत आहे.** पुढील परिच्छेदात नमूद वेतनाच्या तरतूदी कोणत्या आदेशान्वये व केव्हा पासून अमलात आल्या आहेत, हे त्या तरतूदींसोबत/त्याखाली नमूद केले आहे.

२. (कार्यव्ययी कर्मचा-यांसह) नियमित आस्थापनांवर असलेल्या ज्या अंध किंवा अस्थीव्यंगामुळे अधू किंवा कण्याच्या विकाराने पीडित असलेल्या शासकीय कर्मचा-यांना कामाच्या ठिकाणी जाण्यास अथवा तेथून परत येण्यास सर्वसाधारणपणे शारीरिक मदतीची आवश्यकता असते अशा कर्मचा-यांना, वरील (८) येथील आदेशांत विहित केलेल्या वाहतूकभत्त्याच्या अनुज्ञेयतेबाबतच्या अटींच्या अधीन राहून, **त्यातील तक्त्यात नमूद केलेल्या दराच्या दुप्पट दराने** वाहतूक भत्ता वरील (१०) येथील आदेशान्वये दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून मंजूर करण्यात यावा. सुलभ संदर्भासाठी त्या आदेशांतील वाहतूकभत्त्याचा दरविषयक तक्ता आणि अटी खाली पुन्हा उद्धृत केल्या आहेत.

<u>**तक्ता**</u>

| अनु.क्र. | कर्मचा-याची वेतनश्रेणी | दरमहा वाहतूक भत्त्याचा दर (रु.) | |
|---|---|---|---|
| | | "अ-१" आणि"अ" वर्ग शहरे | इतर ठिकाणे |
| १. | रु. ८०००-१३५०० किंवा त्याहून वरच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. .. | ८०० | ४०० |
| २. | रु. ६५००-१०५०० किंवा त्याहून वरच्या परंतु रु. ८०००-१३५०० पेक्षा खालच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. .. | ४०० | २०० |
| ३. | रु. ६५००-१०५०० पेक्षा खालच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. .. | १०० | ७५ |

**टीप :-** १) वरील तक्त्यात नमूद केलेली "अ-१" आणि "अ" शहरे, स्थानिक पूरक भत्त्याच्या प्रयोजनार्थ केलेल्या शहरांच्या वर्गीकरणाप्रमाणे राहतील.

२) ज्या कर्मचा-यांनी असुधारीत वेतनश्रेणीत वेतन घेण्याचा विकल्प दिलेला आहे अशांच्या बाबतीत त्यांनी जर सुधारित वेतनश्रेणी स्वीकारण्याबाबतचा विकल्प दिला असता तर त्यांना जी सुधारित वेतनश्रेणी देय ठरली असती त्या वेतनश्रेणीच्या अनुषंगाने वाहतूक भत्ता विनियमित करण्यात येईल.

<u>**वाहतूकभत्त्याच्या अनुज्ञेयतेबाबतच्या अटी :-**</u> १) कर्तव्यस्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात (Campus) शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या कर्मचा-यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

**टीप :-** वाहतूक भत्त्याचे प्रदान, संबंधित कर्मचा-याने, त्याला पुरविण्यात आलेले शासकीय निवासस्थान, कर्तव्यस्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आंत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात (Campus) नाही अशा आशयाचे प्रमाणपत्र देण्याच्या अधीन राहून करण्यात येईल.

२) ज्या कर्मचा-यांना शासकीय वाहतूक सुविधा (Government Transport) पुरविण्यात आली आहे त्यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. मात्र, कर्तव्यस्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात (Campus) शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या अंध/अस्थीव्यंगामुळे अधू/कण्याच्या विकाराने पीडित असलेल्या शासकीय कर्मचा-यांना वरील (८) व (१०) येथील आदेशांन्वये दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून **वरील तक्त्यात नमूद केलेल्या दराने** वाहतूक भत्ता अनुज्ञेय राहील. मात्र ज्या कर्मचा-यांना शासकीय वाहन पुरविलेले आहे ,त्यांना वाहतूक भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. हया आदेशांच्या प्रयोजनार्थ शासकीय कर्मचा-याच्या बाबतीत किमान शारीरिक अपंगत्वाच्या खालील अटींपैकी किमान एक अट पूर्ण होणे आवश्यक आहे. मुलतः विशेष वाहनभत्त्यासंदर्भात विहीत करण्यात आलेल्या या परिच्छेदातील तरतुदी वरील (८) आणि (१०)येथील आदेशांन्वये दिनांक १ ऑगस्ट,१९९७पासुन वाहतुक भत्त्यासंदर्भातही लागू आहेत.

अ) अस्थीव्यंगामुळे अधू असलेल्या शासकीय कर्मचा-याला वरच्या अथवा खालच्या अवयवाची किमान ४० टक्के कायम स्वरुपाची आंशिक विकलांगता असावी किंवा वरच्या आणि खालच्या अवयवांची मिळून किमान ५० टक्के कायम स्वरुपाची आंशिक विकलांगता असावी. शारीरिक अपंगतेच्या अंदाजासाठी, अमेरिकेतील अस्थीव्यंग शल्यचिकित्सकांसाठी अमेरिकन अकॅडेमी ऑफ आर्थोपेडीक सर्जन्स या संस्थेने कायमची शारिरीक अपंगता शोधून काढण्यासाठी तयार केलेल्या आणि सदर संस्थेच्या वतीने आर्टीफिशल लीम्बस् मॅन्युफॅक्चरिंग कार्पोरेशन ऑफ इंडिया, जी.टी. रोड, कानपूर यांनी प्रकाशित केलेल्या नियमावलीत ग्रंथित केलेल्या मानकांचा अव[illegible] करण्यात यावा.

**टीप :- अस्थीव्यंगामुळे अधू असलेल्या शासकीय कर्मचा-यांना शासकीय रुग्णालयाच्या अस्थीव्यंगोपचार विभागाच्या प्रमुखांची वरील प्रमाणे विकलांगता असल्यांची शिफारस प्राप्त करावी लागेल.**

ब) शासकीय कर्मचा-यांची दोन्ही डोळयांची दृष्टी ३/६० पेक्षा कमी असावी अथवा क्षेत्रदृष्टी (फील्डव्हीजन) १० अंशापेक्षा कमी असावी. परंतु केवळ एका डोळयाने अंध असलेले शासकीय कर्मचारी हया आदेशांच्या प्रयोजनार्थ अंध मानण्यात येऊ नयेत.

**टीप :-** अंध शासकीय कर्मचा-यांना शासकीय रुग्णालयाच्या नेत्रोपचार विभागाच्या प्रमुखांची वरीलप्रमाणे अंधत्व असल्याची शिफारस प्राप्त करावी लागेल.

क) शासकीय कर्मचा-यास पाठीच्या कण्याच्या विकाराने (Spinal deformity-generally known as Hunch back Disability) ४०% पेक्षा अधिक कायमचे आंशिक अपंगत्व आलेले असावे.

**टीप :-**पाठीच्या कण्याच्या विकाराने पीडित असलेल्या शासकीय कर्मचा-यांना शासकीय रुग्णालयाच्या अस्थिव्यंगोपचार अधिकारी (वर्ग-१) यांची वरीलप्रमाणे अपंगत्व असल्याची शिफारस प्राप्त करावी लागेल.

५. वर उल्लेखित अपंग कर्मचा-यांनी हया आदेशांचा लाभ मिळण्यासाठी त्यांच्या विभागप्रमुखांकडे अर्ज करावेत. अपंगत्वाबाबतची आवश्यक ती शिफारस प्राप्त करण्यासाठी अशा कर्मचा-यांची प्रकरणे विभागप्रमुखांनी योग्य त्या वैदयकिय अधिका-याकडे पाठवावीत. संबंधित वैद्यकिय अधिका-यांनी आपल्या शिफारसपत्रात ज्या तारखेपासून अशा कर्मचा-यास वरील परिच्छेद ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अपंगत्व आल्याचे प्रमाणित केले असेल त्या तारखेपासून किंवा त्याच्या शासकीय सेवेतील नेमणूकीच्या तारखेपासून यातील जी तारीख नंतर असेल तेव्हापासून विभागप्रमुखांनी संबंधित कर्मचा-यास वाहतूकभत्ता मंजूर करावा.

६. ज्या प्रकरणी उक्त अपंग कर्मचा-यांना संबंधित विभागप्रमुखांकडून वाहतुकभत्ता मंजूर करण्यासाठी वैद्यकिय शिफारस मिळविण्याकरीता त्यांच्या मुख्यालयाच्या बाहेरील ठिकाणी असलेल्या शासकीय रुग्णालयात पाठविण्यात आले असेल अशा प्रकरणी त्यांना ते दौ-यावर असल्याचे मानून प्रवासभत्ता व दैनिकभत्ता मंजूर करण्यात यावा, व हया कामासाठीचा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा कर्तव्य कालावधी समजण्यात यावा.

मात्र जे कर्मचारी आवश्यक ते शिफारसपत्र मिळविण्यास पात्र ठरलेले नाहीत म्हणजेच ज्यांच्या बाबतीत हया आदेशांच्या प्रयोजनार्थ आवश्यक तेवढे अपंगत्व नाही अशा कर्मचा-यांना वरील सवलत मिळणार नाही.

*(मुलतः विशेष वाहनभत्त्यासंदर्भात विहीत करण्यात आलेल्या वरील परिच्छेद (५) आणि (६) मधील कार्यपद्धती/ तरतुदी वरील (८) आणि (१०)येथील आदेशांन्वये दिनांक १ ऑगस्ट,१९९७पासुन वाहतुक भत्त्यासंदर्भातही लागू आहेत.)*

एच-273(सी)(12000+50-6-01)2

७. सदर वाहतूकभत्ता हा रजा, प्रशिक्षण, दौरा इत्यादी कारणांमुळे ३० दिवसांपेक्षा जास्त अनुपस्थितीच्या कालावधीसाठी अनुज्ञेय असणार नाही.

*(वरील (८) व (१०) येथील आदेशान्वये दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून अंमलात)*

८. सर्व अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्थाच्या प्राथमिक माध्यमिक शाळांतील पुर्णकालीक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी तसेच कृषि व कृषितर विद्यापीठातील व तत्संलग्न महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी त्याचप्रमाणे शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: मभवा-११८६/३९४/सेवा-१०, दिनांक १८ ऑगस्ट,१९८६ मधील परिच्छेद ६ मध्ये उल्लेखिलेले इतर कर्मचारी यांना सहरहू आदेश लागू असतील.

९. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम,१९६१(सन १९६२ चा अधिनियम क्रमांक ५) च्या कलम २४८ च्या परतुकान्वये प्रदान केलेले अधिकार व त्या संबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, जिल्हा परीषदांच्या पूर्णकालीक कर्मचा-यांनासुध्दा हे आदेश योग्य त्या फेरफारासह लागू करण्यात यावेत.

१०. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या वेतनमानानुसार वेतन घेणा-या शिक्षक कर्मचा-यांनाही हे आदेश लागू करण्यात यावेत.

११. संबंधित विभागीय प्रमुखांनी सदरहू आदेश स्थानिक संस्थांच्या आणि सर्व संबंधित संस्थांच्या व्यवस्थापनांच्या निदर्शनास आणून द्यावेत. शासनाने वेळोवेळी मंजूर केलेल्या सहायक अनुदान नियमानुसार हया भत्त्यासाठी सहाय्यक अनुदान अनुज्ञेय होईल असे त्यांनी व्यवस्थापनांना कळवावे.

१२. शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत या आदेशाच्या परिणामी होणारा वाहतूक भत्त्यावरील खर्च हा त्यांचे वेतन व भत्ते यासंबंधीचा खर्च ज्या संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येतो, त्याच लेखा शिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

अनुदान प्राप्त संस्था व जिल्हापरिषदा यांच्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीतील खर्च संबंधित प्रमुख लेखाशिर्षाखालील ज्या उप-लेखाशिर्षाखाली त्यांच्या सहायक अनुदानाच्या खर्च खर्ची घालण्यात येतो, त्या उप-लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

*(वरील परिच्छेद ८ ते १२ मधील तरतूदी वरील (८), (९) व (१०) येथील आदेशांनुसार दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून अंमलात)*

१३. या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात येत असलेल्या सूचना म्हणजे या विषयी पूर्वीच देण्यात आलेल्या आदेशांतील तरतूदींपैकी सध्या अंमलात असणा-या तरतूदींचे केवळ माहितीसाठी केलेले एकत्रिकरण आहे. या परिपत्रकान्वये कोणतेही नवे आदेश देण्यात आलेले नाहीत. मात्र, प्रकरणे सादर करतांना या परिपत्रकाचा संदर्भ देण्यास हरकत नाही. विशेष वाहनभत्ता/वाहतूक भत्त्याच्या संदर्भातील यापूर्वीची प्रकरणे त्या-त्या कालावधीत लागू असणा-या आदेशांतील तरतूदीनुसार विनियमित करावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अ.वि.सागवणकर
शासनाचे सहसचिव

एच-273(सी)(12000+50-6-01)2अ

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सहसंचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट,मुंबई,
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
नगरविकास विभाग, युडी-१०, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
कृषि व पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास मत्स्यव्यवसाय विभाग (२० प्रती)
आदिवासी विकास विभाग (२० प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
संचालक, आदिवासी संशोधन व शिक्षण संसथा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक,
सर्व विभागातील समाजकल्याण अधिकारी,
अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना , नाशिक / नागपूर,
सर्व समाजकल्याण अधिकारी, वर्ग-१,
सर्व आदिवासी कल्याण अधिकारी,
सर्व प्रकल्पाधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प,
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी,
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई,
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे,
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर,
* पत्राद्वारे

उपमुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती),
उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती)
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (४० प्रती)
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (१०० प्रती),
संचालक, तांत्रिक शिक्षण द्वारा - तंत्रशिक्षण संचालक, मुंबई (२५० प्रती)
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार वित्त मंत्रालय (व्यय विभाग) खोली क्र.२६१,नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (प्रत्येकी १० प्रती)
सर्व विभागीय तंत्रशिक्षण उपसंचालक (प्रत्येकी १० प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी .
आयुक्त, महानगरपालिका, नागपूर,
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका, शिक्षण मंडळे (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यासह)
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/ देवळाली/अहमदनगर..
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (१० प्रती)
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती,
कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई,
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव,
अधिक्षक, वेतनपथक, सर्व जिल्हे,
शिक्षण निरिक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग),
सर्व कन्याशाळा निरिक्षिका,
सर्व जिल्ह्याचे वरिष्ठ लेखापरिक्षक, (शिक्षण विभाग८,
शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका,
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व प्रादेशिक संचालक नगरपालिका प्रशासन,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-५.

---

एच-273(सी)(12000+50-6-01)3.